नांदेड जिल्हा कारागृह येथे पिण्याच्या पाण्याची टाकी बांधण्याच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग

शासन निर्णय क्र. बांधका २००३/प्र.क्र. १५९/पीआरएस-२

मंत्रालय, मुंबई-३२, दि. २५ मे, २००४

वाचा :- कारागृह उप महानिरिक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलडी/६९३५/१३५/४२७३/कक्ष-३, दि. ७.५.२००३.

**शासन निर्णय** :- नांदेड जिल्हा कारागृहात ३०० बंदी आहेत. शिवाय २९ कारागृह कर्मचारी यांची कुटुंबे कारागृह परिसरात (शेजारी) रहात आहेत. या सर्वांना नगरपालिकेमार्फत पाणीपुरवठा केला जात असून, तेथे पाणी साठविण्याकरिता स्वतंत्र पाण्याची टाकी नसल्याने तसेच बऱ्याच वेळा पाणी पुरवठा कमी होत असल्याने कारागृहात पाणी टंचाई भासत असून टँकरद्वारे पाणीपुरवठा केला जात आहे. यासाठी तेथे स्वतंत्र पिण्याच्या पाण्याची टाकी बांधणे गरजेचे असल्याने त्यासाठी उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर), उप विभाग, नांदेड यांनी साक्षांकन करुन पाठविलेले रु. ३,२५,८००/- (रुपये तीन लाख पंचवीस हजार आठशे फक्त) इतक्या रकमेच्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशयांस प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

२. नांदेड जिल्हा कारागृहात स्वतंत्र पिण्याच्या पाण्याची टाकी बांधणे गरजेचे असल्याने त्यासाठी लागणाऱ्या रुपये ३,२५,८००/- इतक्या खर्चाचा समावेश केंद्रपुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेच्या सन २००३-२००४ च्या सुधारीत आराखड्यात केलेला असून, उपरोक्त वस्तुस्थिती, कारागृहाची सुरक्षितता, कामाची निकड व त्यामुळे बंद्यांना होणारी सोयीसुविधेतील वाढ या बाबींचा काळजीपूर्वक विचार करुन नांदेड जिल्हा कारागृहात स्वतंत्र पिण्याच्या पाण्याची टाकी बांधण्यासाठी उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) उप विभाग, नांदेड यांनी पाठविलेल्या रुपये ३,२५,८००/- (रुपये तीन लाख पंचवीस हजार आठशे फक्त) इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशास शासन या आदेशाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (२०५६-०९८९)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. मात्र निधी उपलब्ध झाल्यानंतरच विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार सदर बांधकामाचे काम सुरु करण्यात यावे

व खर्चाची माहिती विहित विवरणपत्रात केंद्रशासनास पाठविण्यासाठी शासनास सादर करावी.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाने त्यांचे अनौपचारीक संदर्भ क. सीआर १८०/०४/व्यय-८, दि. ०१.०३.२००४ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,

- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद.
- अधिक्षक, नांदेड जिल्हा कारागृह, नांदेड.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर.
- जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
- उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) उप विभाग, नांदेड.
- सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२.
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.